**<u>वित्तीय मान्यता-</u>**
**सन २०१६-१७ मध्ये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत ( NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन ( SHM ) योजना राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मृदस १४१६/ प्र.क्र.२३६ / १७ अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख : ०४ जानेवारी, २०१७

**<u>वाचा:-</u>**

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.inया सांकेतिक स्थळावर निर्गमितकेलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत मृद आरोग्य व्यवस्थापन योजनेच्या मार्गदर्शक सुचना
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. १४-२०/२०१४/, फर्ट युज दि. १० ऑक्टोंबर २०१६ चे पत्र
३) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. मृदस १४१६/प्र.क्र.१४४/१७ अे, दि. ०८/०७ /२०१६
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०१६ /प्र.क्र. ८९ / अर्थ - ३, दि. २० एप्रिल, २०१६

**<u>प्रस्तावना:-</u>**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत मृद आरोग्य व्यवस्थापन योजनेची सुरूवात केंद्र शासनाने सन २०१४-१५ पासून सुरू केलेली आहे. सन २०१५-१६ पासून ही योजना केंद्र हिस्सा ६० टक्के व राज्य हिस्सा ४० टक्के प्रमाणात राबविण्यात येत आहे. या योजनेमध्ये फिरती / स्थायी मृद चाचणी प्रयोगशाळेची उभारणी करणे, शासकीय मृद सर्वेक्षण मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे व खत नियंत्रण चाचणी प्रयोगशाळेच्या बळकटीकरणाकरीता अर्थसहाय्य देणे हे घटक राबविण्यात येत आहेत.

केंद्र शासनाने सन २०१६-१७ साठी मंजूर केलेल्या नियतव्ययानुसार संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने दि. १०.१०.२०१६ च्या पत्रान्वये मृद आरोग्य व्यवस्थापन अंतर्गत मिनी लॅब उभारणीकरिता केंद्र हिश्याच्या पहिल्या हप्त्यापोटी रू. ४४५.०० लाख इतकी रक्कम वितरीत केलेली आहे. त्यानुसार सन २०१६-१७ मध्ये मृद आरोग्य व्यवस्थापन अंतर्गत मिनी लॅब उभारणीकरिता केंद्र हिश्श्याच्या पहिल्या हफ्त्यापोटी रू.४४५.०० लाख रकमेस वित्तीय मान्यतादेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत ( NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन योजनेसाठी सन २०१६-१७ मध्ये राज्यात राबविण्यासाठी केंद्र हिस्साच्या पहिल्या हफ्त्यापोटी वितरीत केलेल्या रु.४४५.०० लाख ( रुपये चार कोटी पंच्चेचाळीस लाख फक्त ) इतक्या निधीस शासन वित्तीय मान्यता देत आहे.

**२.** सदर योजनेतंर्गत रु. ४४५.०० लाख निधीचा घटकनिहाय भौतिक व आर्थिक लक्ष्य पुढीलप्रमाणे राहील.

**(रुपये लाखात)**

| **अ.क्र.** | **घटक** | **भौतीक** | **दर (रुपये)** | **एकुण मंजूर नियतव्यय** | **केंद्र हिस्सा (६० %)** | **केंद्र हिस्सा वितरीत करावयाचा निधी** |
|---|---|---|---|---|---|---|
| | मिनी लॅब उभारणी | १३१८ | ०.७५ | ९८८.५० | ५९३.१० | ४४५.०० |

**३.** या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र. डी-३
२४०२, मृद व जलसंधारण.
(००) ( १०१) मृद सर्वेक्षण व चाचणी
( ००) (१३) कृषी उन्नती योजना-मृदा आरोग्य व्यवस्थापन-उपअभियान ( केंद्र पुरस्कृत)
( केंद्र हिस्सा ६० %) सर्वसाधारण ( २४०२ १०४६) योजनांतर्गत
३३ - अर्थसहाय्य**.**

**४. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे**.

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या पत्रात नमुद केलेल्या अटी व शर्तीनुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखापरिक्षण केलेला अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावा.त्याप्रमाणे अनुसूचित जाती / जमाती / महिला लाभार्थ्यासाठी खर्चाचे लेखे वरील प्रमाणे ठेवण्याची जबाबदारी अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणेची राहील.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबीवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा. तसेच सदरचा अहवाल राज्य शासनाकडेसुध्दा पाठविण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमाखर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमुद करण्यात यावे जेणेकरून पारदर्शी स्वरूपात सदर रकमा विचारात घेता येतील व संदीग्धता राहणार नाही.

**५.** कोणत्याही परिस्थितीत मंजुर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही, या बाबत कृषि संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण ) कृषि आयुक्तालय, पुणे. यांनी आवश्यक ती दक्षता घ्यावी.

**६.** कृषि संचालक( निविष्ठा व गुण नियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य-पुणे हे योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणुन काम पाहतील व सहाय्यक संचालक लेखा - १ , कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिका-यांना मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

**७.** प्रस्तुतचे आदेश वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं- २०१६/प्र.क्र. ८९/ अर्थ - ३ , दिनांक २० एप्रिल, २०१६ अन्वये दिलेल्या अधिकारान्वये व प्रधान सचिव ( कृषी) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०४१६५६३२७३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash R Kadam

Digitally signed by Prakash R Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash R Kadam
Date: 2017.01.04 17:00:45 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री ( कृषि )/रा.मंत्री ( कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव (कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक (कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त ( कृषि),महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, पुणे
५) सर्व संचालक / सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे
६) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
७) सहाय्यक संचालक लेखा - १, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
११) नियोजन विभाग-१४३१
१२) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवडनस्ती.